**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील उपअभियंता (यांत्रिकी) संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः : आपना-०२२३/प्र.क्र.१७/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीखः २४ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २२ जून, २०२१

३) शासन आदेश,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना २०१३/प्र.क्र.२४९/पापु-१५ दिनांक ३१ जुलै, २०१४

४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांक: प्रशासन/आस्था-५/श्री.नितीन दंडगव्हाळ/वै.पं./०५/२०२२ दि.०२ जानेवारी, २०२३

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील "उपअभियंता (यांत्रिकी)" या पदावर संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता अधिकाऱ्यांच्या नियुक्ती करण्यात आली आहे. या नियुक्त्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारीत मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून उपअभियंता (यांत्रिकी) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने व तशी शिफारस आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये केलेली असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित "उपअभियंता (यांत्रिकी)" म्हणून स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील खालील "उपअभियंता (यांत्रिकी)" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे नाव | उपअभियंता (यांत्रिकी) पदावर रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | उपअभियंता (यांत्रिकी) पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. नितीन मुरलीधर दंडगव्हाळ | २५/०८/२०१४ | २४/०८/२०१६ | २५/०८/२०१६ |

आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना कळविण्यात येते की, उक्त उपअभियंता (यांत्रिकी) यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२४११२५२५७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.08.24 15:17:36 +05'30'

**(गणेश पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती / यवतमाळ / जळगाव / नागपूर.
४. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. महालेखापाल,लेखापरीक्षा-१, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल, लेखापरीक्षा-२, महाराष्ट्र, नागपूर.
८. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
९. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
१०. श्री. नितीन मुरलीधर दंडगव्हाळ, उपअभियंता (यांत्रिकी) (संचालनालयामार्फत).
११. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५).